**बाळापूर, ता.अकोला,जि.अकोला येथील ३० खाटांच्या ग्रामीण रुग्णालयाचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः स्थापना -२०२२/ प्र.क्र.९३/आरोग्य-३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य रुग्णालय मार्ग, मुंबई-४०० ००१.
तारीख: ११ मे, २०२२.

**वाचा: आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- आआसे/कक्ष-३/टे-७/ग्रारु बाळापूर/ अकोला श्रेणी १०० अ.मं ३५ /जा.क्र.१३९२-९३/२२,दिनांक- ११.०२.२०२२.**

**प्रस्तावना -**

ग्रामीण रुग्णालय, बाळापूर श्रेणीवर्धन करण्याबाबत लोकप्रतिनिधीकडुन वारंवांर मागणी करण्यात येत आहे. त्यामुळे आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी उपरोक्त दि.११.०२.२०२२ च्या पत्रान्वये ग्रामीण रुग्णालय बाळापूर,ता.अकोला, जि.अकोला येथील ग्रामीण रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव सादर केला असून त्यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

बाळापूर, ता.अकोला, जि.अकोला येथील ग्रामीण रुग्णालय ३० खाटांवरुन ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर श्रेणीवर्धीत ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयासाठी पुरेशा प्रमाणात जागा उपलब्ध आहे. त्यामुळे सदर जागेमध्ये बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०५११०२३८३९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, cn=Roshani Dinesh Kadam Patil
Date: 2022.05.11 15:00:34 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण ) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
६. संचालक-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. संचालक-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे
८. सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
९. सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र -जिपस्तर), पुणे.
१०.उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ,अकोला
११.जिल्हा शल्य चिकित्सक, अकोला
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
१३.वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१४.नियोजन विभाग,(का.१४७२) मंत्रालय,मुंबई
१५.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१६. निवडनस्ती (आरोग्य-३)